RNI No. MAHBIL/2009/31747
Reg. No. MH/MR/South-326/2010-12



# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग एक-ल

वर्ष १, अंक ४३] शुक्रवार, ऑगस्ट १२, २०११/श्रावण २१, शके १९३३ [पृष्ठे ४८

किंमत : रुपये १३.००

**असाधारण क्रमांक ८९**

## प्राधिकृत प्रकाशन

**(केंद्रीय) औद्योगिक विवाद अधिनियम व मुंबई औद्योगिक संबंध अधिनियम यांखालील (भाग एक, चार-अ, चार-ब आणि चार-क यांमध्ये प्रसिद्ध केलेल्या अधिसूचना, आदेश व निवाडे यांव्यतिरिक्त) अधिसूचना, आदेश व निवाडे.**

### उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १२ ऑगस्ट २०११

### अधिसूचना

**कारखाने अधिनियम, १९४८.**

क्रमांक एफएसी.२००९/प्र.क्र. ३०९/काम-४.—कारखाने अधिनियम, १९४८, (१९४८ चा ६३) यांचे कलम ११२ द्वारे प्रदान केलेल्या व याबाबतीत त्यास समर्थ करणा-या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन, कारखान्यांमध्ये काम करीत असलेल्या कामगारांची सुरक्षा, आरोग्य व कल्याण यांची सुनिश्चिती करण्यासाठी विर्पाक्षत अतिरिक्त तरतुदी करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा), नियम, २०११ याचा मसुदा तयार करण्याचे प्रस्तावित असून, त्याद्वारे परिणाम होण्याची शक्यता असलेल्या सर्व व्यक्तींच्या माहितीकरिता, उक्त अधिनियमाच्या कलम ११५ द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे याद्वारे प्रसिद्ध करीत असून : याद्वारे नोटीस देण्यात येत आहे की, उक्त मसुदा **महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात** ही अधिसूचना प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून दोन महिन्यांचा कालावधी संपल्यानंतर, महाराष्ट्र शासनाकडून विचारात घेण्यात येईल.

२. वर नमूद केलेला कालावधी संपण्यापूर्वी, उक्त मसुद्याच्या संबंधात कोणत्याही व्यक्तीकडून, संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५ वा मजला, ' ई ' ब्लॉक, सी-२०, भारतीय रिझर्व बँकेसमोर, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१ यांना प्राप्त झालेल्या कोणत्याही हरकती व सूचना शासनाकडून विचारात घेण्यात येतील.

## नियमांचा मसुदा

### महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षा) नियम, २०११

**१. संक्षिप्त नाव व व्याप्ती :—** (१) या नियमांना, महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षा) नियम, २०११, असे म्हणावे.

(२) हे नियम कारखान्यांच्या पुढील प्रवर्गांना लागू होतील :—

(एक) प्रवर्ग एक मधील कारखाने,

(दोन) प्रवर्ग दोन मधील कारखाने,

(तीन) प्रवर्ग तीन मधील कारखाने,

(चार) प्रवर्ग चार मधील कारखाने,

**२. व्याख्या.—** (१) या नियमांमध्ये, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(एक) " अधिनियम " याचा अर्थ, कारखाना अधिनियम, १९४८ (१९४८ चा ६३) असा आहे ;

(दोन) " पदवी " याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी, असा आहे ;

(तीन) " पदविका " याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाने किंवा मान्यताप्राप्त संस्थेने प्रदान केलेली पदविका, असा आहे ;

(चार) " नमूना " याचा अर्थ, या नियमांना जोडलेला नमुना, असा आहे ;

(पाच) " शासन " किंवा " राज्य शासन " याचा अर्थ, महाराष्ट्र शासन, असा आहे ;

(सहा) " व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षा " याचा अर्थ, एखाद्या कारखान्यातील व त्या कारखान्याच्या संबंधातील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्यप्रणाली व्यवसाय, रीत आणि कार्यपद्धती यांचे पद्धतशीर, वस्तुनिष्ठ निर्धारण आणि लेखे मूल्यमापन, असा आहे ;

(सात) " व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षा " याचा अर्थ, या नियमांनुसार व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षा करण्यासाठी या नियमान्वये मान्यता नि विलोपन समितीने अनुसूची दोन मध्ये विनिर्दिष्ट केलेले व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, श्रेणी एक, दोन, तीन किंवा चार म्हणून मान्यता दिलेली व्यक्ती, असा आहे ;

(आठ) " अनुसूची " याचा अर्थ, या नियमांना जोडलेली अनुसूची, असा आहे ;

(नऊ) " कलम " याचा अर्थ, अधिनियमाचे कलम, असा आहे ;

(दहा) " धोकादायक रसायन " याचा अर्थ, महाराष्ट्र कारखाने (उद्योगातील मोठ्या अपघाताच्या धोक्याचे नियंत्रण) नियम, २००३ यांच्या नियम २, पोट-नियम (अ) मध्ये व्याख्या केलेले कोणतेही रसायन, असा आहे ;

(अकरा) " प्रवर्ग एक मधील कारखाने " याचा अर्थ, महाराष्ट्र कारखाने (उद्योगातील मोठ्या अपघाताच्या धोक्याचे नियंत्रण) नियम, २००३ यांच्या नियम २(ड), मध्ये व्याख्या केलेले कोणतेही कारखाने, असा आहे ;

(बारा) " प्रवर्ग दोन मधील कारखाने " याचा अर्थ, प्रवर्ग एक मधील कारखाने वगळून ज्या कारखान्यांत धोकादायक रसायनांचा वापर, साठवण, हाताळणी किंवा संस्करण केले जात असेल किंवा ज्यामधून अशी धोकादायक रसायने निर्माण होण्याची किंवा बाहेर पडण्याची शक्यता असेल ते कारखाने, असा आहे ;

(तेरा) " प्रवर्ग तीन मधील कारखाने " याचा अर्थ, प्रवर्ग एक व दोन मधील कारखाने वगळून ज्या कारखान्यांत विजेचा वापर करून उत्पादन प्रक्रिया केली जात असेल, ते कारखाने, असा आहे ;

(चौदा) " प्रवर्ग चार मधील कारखाने " याचा अर्थ, प्रवर्ग एक, प्रवर्ग दोन व प्रवर्ग तीन मधील कारखाने वगळून ज्या कारखान्यात उत्पादन प्रक्रिया चालू असेल, ते कारखाने, असा आहे ;

(पंधरा) " मान्यता नि विलोपन समिती " याचा अर्थ, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक यांना मान्यता देण्यासाठी, प्रधान सचिव, सचिव, कामगार, महाराष्ट्र शासन हे अध्यक्ष असलेली व पुढील सदस्य असलेली समिती, असा आहे ;

(अ) कारखाना सल्ला सेवा व श्रम संस्था महासंचालनालय, मुंबई यांचे दोन (२) तज्ज्ञ-सदस्य,

(ब) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, मुंबई–सदस्य सचिव,

(क) अध्यक्षांनी नियुक्त केलेला मालकांचा एक प्रतिनिधी–सदस्य,

(ड) अध्यक्षांनी नियुक्त केलेला कामगारांचा एक प्रतिनिधी–सदस्य ;

(सोळा) " प्रशिक्षण संस्था मान्यता समिती " याचा अर्थ, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षकांसाठी पूर्व प्रशिक्षण व उजळणी प्रशिक्षण चालविणा-या संस्थांना मान्यता देण्याकरिता प्रधान सचिव, सचिव, कामगार, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, महाराष्ट्र शासन हे अध्यक्ष असलेले व पुढील सदस्य मिळून बनलेली समिती, असा आहे ;

(अ) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य प्रशिक्षण यांमधील विशेष ज्ञान असलेल्या संस्थांमधून अध्यक्षांनी नियुक्त केलेले तीन प्रतिनिधी–सदस्य,

(ब) तंत्रशिक्षण संचालनालयाने नामनिर्देशित केलेला त्या संचालनालयाचा एक प्रतिनिधी-सदस्य,

(क) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई-सदस्य–सचिव.

२. या नियमांमध्ये वापरलेले परंतु व्याख्या न केलेले शब्द व शब्दप्रयोग यांना अधिनियमामध्ये अनिक्रमे नेमून दिल्याप्रमाणेच अर्थ असतील.

३. नियम १ च्या पोट-नियम (दोन) मध्ये नमूद केलेल्या कारखान्याचा भोगवटादार :—

(अ) कारखान्यातील कर्मचा-यांकडून बारा महिन्यापेक्षा अधिक नसेल इतक्या कालांतराने अंतर्गत,

(ब) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षकाकडून चोवीस महिन्यांपेक्षा अधिक नसेल इतक्या कालांतराने बाह्य,-व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षण करण्याची व्यवस्था करील :

परंतु, बाह्य लेखापरीक्षा केल्यानंतर बारा महिन्यांच्या कालावधीत अंतर्गत लेखापरीक्षा करण्याची आवश्यकता नसेल परंतु, आणखी असे की, कारखान्यातील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्यावर परिणाम होण्याची शक्यता असलेल्या निर्मिती प्रक्रियेत कोणतेही पूर्णतः किंवा अंशतः बदल केल्यास, भोगवटादार अशा बदलापासून एका महिन्याच्या आत, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरिक्षकाकडून, बाह्य व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य व लेखापरीक्षा करवून घेण्याची व्यवस्था करील.

४. व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य आणि लेखापरीक्षा ही व्यावसायिक सुरक्षा व लेखापरिक्षेवरील व्यवसायाची भारतीय मानक संहिता (Indian Standard Code of Practice on Occupational Safety and Health Audit) याच्या भारतीय मानक १४४८९:१९९८ नुसार किंवा त्या त्या वेळी प्रचलित असलेल्या या मानकाच्या कोणत्याही अद्ययावत, नमुन्यानुसार, प्रवर्ग चार मधील कारखाने वगळून करण्यात येईल, या कारखान्यांची व्यावसायिक सुरक्षा आणि आरोग्य लेखापरीक्षा अनुसूची एक मध्ये तरतूद केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात येईल.

५. (१) मान्यता नि विलोपन समितीला, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा करण्याच्या प्रयोजनासाठी व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून या नियमांच्या अनुसूची दोन मध्ये निर्धारित केलेली अर्हता, अनुभव व इतर आवश्यक बाबी धारण करणा-या कोणत्याही व्यक्तीस, मान्यता देता येईल,

(२) मान्यता नि विलोपन समितीला, या नियमांमध्ये तरतूद केल्याप्रमाणे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा करण्याच्या प्रयोजनासाठी, अनुसूची दोन मध्ये निर्धारित केलेली अर्हता, अनुभव आणि इतर आवश्यक बाबी धारण करणा-या किमान तीन व्यक्ती नोकरीस असलेल्या कोणत्याही संस्थेस, मान्यता देता येईल,

परंतु, ज्या संस्थेला अशी मान्यता दिलेली असेल ती संस्था, अनुसूची दोन मध्ये निर्धारित केलेली अर्हता, अनुभव आणि इतर आवश्यक बाबी धारण करणा-या किमान तीन व्यक्तींना नोकरीवर ठेवण्याचे बंद करील तेव्हा अशा संस्थेला दिलेली मान्यता खंडित होईल.

६. (१) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा करण्यासाठी मान्यता मिळविण्यासाठीचा किंवा मान्यता प्रमाणपत्राचे नूतनीकरण करण्यासाठीचा अर्ज, व्यक्तीकडून नमुना अ १ मध्ये आणि संस्थेकडून नमुना अ २ मध्ये सदस्य--सचिव, मान्यता निविलोपन समिती यांच्याकडे करण्यात येईल.

(२) पोट-नियम (१) खालील प्रत्येक अर्जासोबत खालील बाबी जोडलेल्या असतील :—

(अ) संस्थेच्या बाबतीत रुपये ३०,००० इतकी आणि व्यक्तीसाठी खालीलप्रमाणे म्हणजे :—

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी एक साठी रुपये १०,००० ; श्रेणी दोन साठी रुपये ७,००० ; श्रेणी तीन साठी रुपये ५,००० ; श्रेणी चार साठी रुपये ३,००० इतकी ना परतावा प्रक्रिया फी असलेले कोषागार चलान—

(ब) कोणतेही शासकीय जिल्हा शल्य चिकित्सक किंवा प्रमाणक शल्य चिकित्सक यांनी प्रदान केलेले आरोग्य व स्वास्थ्यतेचे सर्वसाधारण वैद्यकीय प्रमाणपत्र.

(क) शैक्षणिक अर्हतेच्या साक्षांकित प्रती,

(३) या नियमांनुसार यथोचितरित्या भरलेला अर्ज मिळाल्यावर मान्यता नि विलोपन समिती अशा अर्जाची तावडतोब नोंद घेईल,

(४) मान्यता नि विलोपन समिती ही, तिने वेळोवेळी निश्चित केलेल्या दिनांकांना सर्व अर्जदारांची कमाल एकूण ८० गुणांची लेखी चाचणी घेईल आणि कमाल एकूण २० गुणांची मुलाखत, घेईल.

(५) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून अर्ह ठरण्यासाठी, अर्जदार लेखी चाचणीत कमीत कमी ४० गुण व मुलाखतीत किमान १० गुण मिळवील.

(६) मान्यता नि विलोपन समिती, मुलाखतीच्या दिनांकापासून एका महिन्याच्या कालावधीत, अर्हताप्राप्त व्यक्तींना नमुना-ब मध्ये आणि अर्हताप्राप्त संस्थेला नमुना-क मध्ये मान्यता प्रमाणपत्र देईल.

(७) पोट-नियम (३) अन्वये दिलेली मान्यता. मान्यता प्रमाणपत्र दिल्याच्या दिनांकापासून दोन वर्षांपर्यंत वैध असेल.

**७.** मान्यता निविलोपन समिती, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून खालील शर्तींवर मान्यता प्रमाणपत्र प्रदान करील :—

(एक) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षणाची रोजवही (लॉग बुक) ठेवील,ज्यामध्ये व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण केलेल्या उपक्रमाचे नाव व पत्ता, संपर्क साधलेल्या व्यक्ती, लेखापरीक्षणाचा दिनांक तसेच परीक्षण अहवाल, अनुक्रमे उपक्रमाला आणि औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाला सादर केलेले दिनांक नमूद केलेले असतील, सदर अहवाल औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयांच्या अधिका-यांना आवश्यक असेल तेव्हा तेव्हा सादर करण्यात येईल.

(दोन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, ज्या कारखान्यांमध्ये तो लेखापरीक्षक काम करीत असेल किंवा त्या कारखान्याचा अथवा त्याच्या कुटुंबातील व्यक्तींच्या, नातेवाईकांच्या वा दूरच्या नातेवाईकांच्या मालकीच्या, त्यांनी प्रचालन केलेल्या, व्यवस्थापन केलेल्या वा चालविलेल्या कोणत्याही कारखान्याचा भोगवटादार, भागीदार, संचालक किंवा व्यवस्थापक असेल, किंवा ज्यामध्ये लेखापरीक्षकाचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष हितसंबंध असेल, असा कारखान्यांचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करणार नाही. ज्या कारखान्यांना लेखापरीक्षकाने संयंत्र व यंत्रसामग्री, कच्चा माल, सुरक्षेची साधने किंवा इतर माल, साधने किंवा सेवा पुरवलेली असेल, अशा कारखान्यांची तो व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करणार नाही.

(तीन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाची, मान्यता रद्द झाली तरीही, त्याने, लेखापरीक्षक म्हणून आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या ओघात त्याला किंवा तिला ज्ञात झालेली कोणतीही उत्पादन विषयक किंवा व्यावसायिक गुपिते किंवा उत्पादन प्रक्रिया किंवा इतर गोपनीय माहिती जाहीर करू नये. यात कसूर झाल्यास, त्यांच्यावर एकतर फौजदारी किंवा दिवाणी किंवा दोन्ही कायदेशीर कारवाई होऊ शकेल.

(चार) (अ) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी-एक, कोणत्याही (प्रवर्गातील) कारखान्याचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करील.

(ब) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी दोन, हा फक्त प्रवर्ग-दोन, प्रवर्ग तीन व प्रवर्ग-चार, यांमधील कारखान्यांचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करील.

(क) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी तीन, हा फक्त प्रवर्ग-तीन व प्रवर्ग-चार यांमधील कारखान्याचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करील.

(ड) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी-चार, हा फक्त प्रवर्ग-चारमधील कारखान्यांचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करील.

(पाच) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करताना व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाला काही धोका आढळल्यास, तो, असा धोका त्याला आढळून आल्यापासून चार तासांच्या आत अशा धोक्याची माहिती भोगवटादारास आणि औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयांच्या संबंधित कार्यक्षेत्रातील अधिका-यांस देईल.

(सहा) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करीत असताना श्रेणी-एक व तीन मधील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक भारतीय मानक १४४८९:१९९८ मध्ये घालून दिलेली मानके व कार्यपद्धती यांचे अनुसरण करील. श्रेणी-चार मधील लेखापरीक्षक अनुसूची एक मध्ये निर्दिष्ट केलेली मार्गदर्शक तत्वे अनुसरील.

(सात) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक ज्या विभागातील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करण्यास मान्यता मिळालेली असेल, अशा औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयांच्या संबंधित कार्यक्षेत्रातील अधिका-याला त्याबाबत संयुक्तीकपणे शक्य होईल तितक्या लवकर लेखी कळवील.

(आठ) संस्थेच्या बाबतीत, त्या संस्थेच्या मान्यतेबाबतच्या अर्जाच्या नमुन्यामध्ये घोषित केलेले आणि मान्यता-नि-विलोपन समितीची व्यक्तीशः मान्यता मिळालेली आहे असेच कर्मचारी केवळ व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा करतील.

८. (१) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून मिळालेल्या मान्यतेच्या नुतनीकरणासाठी करावयाचा अर्ज, मान्यता कालावधी समाप्त होण्याच्या किमान तीन महिने अगोदर करण्यात येईल.

(२) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून मिळालेल्या मान्यतेच्या नूतनीकरणासाठी, मान्यता-नि-विलोपन समिती कमाल २० गुणांची मुलाखत घेईल. सदर मुलाखतीत अर्जदाराने किमान १० गुण मिळविल्यास, तो व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून मिळालेल्या मान्यतेच्या नूतनीकरणासाठी पात्र ठरेल.

(३) अर्जदार, पुढील कारणास्तव, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून मिळालेल्या मान्यतेचे नूतनीकरण करण्यास पात्र असणार नाही :

(एक) मान्यता-नि-विलोपन समितीने मागील ३ वर्षात त्या लेखापरीक्षकाची मान्यता रद्द केली असेल ;

(दोन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाने मागील दोन वर्षांच्या कालावधीत किमान तीन व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षणे केलेली नसतील ;

(तीन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाने प्रशिक्षण संस्था मान्यता समितीने, मान्यता दिलेल्या संस्थेतून दर तीन वर्षांनी व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षेवरील उजळणी प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण केले नसेल, आणि

(चार) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाने, त्यास, ज्या शर्तींच्या अधीनतेने व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून मान्यता प्रमाणपत्रात दिलेले असेल अशा कोणत्याही शर्तींचे उल्लंघन केलेले असेल.

**९.** (१) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाने या नियमांमध्ये किंवा व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून त्याला दिलेल्या मान्यता प्रमाणपत्रामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कोणत्याही शर्तींचे उल्लंघन केले असेल, तर मान्यता-नि-विलोपन समिती दिलेले मान्यता प्रमाणपत्र रद्द करील.

(२) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकास आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतरच, मान्यता-नि-विलोपन समिती, त्याला दिलेले मान्यता प्रमाणपत्र रद्द करील.

(३) मान्यता-नि-विलोपन समिती, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाचे प्रमाणपत्र रद्द करण्याच्या कार्यवाहीच्या दिनांकासह, त्या कार्यवाहीबाबत आणि त्यास त्याच्या किंवा तिच्या प्रकरणात उपस्थित राहण्याबाबत त्या लेखापरीक्षकास कळवील.

(४) सदर प्रकरणात मान्यता-नि-विलोपन समिती, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकास या बद्दलचा निर्णय, ही कार्यवाही सुरू झाल्यापासून तीन महिन्यांच्या आत कळवील :

परंतु, मान्यता-नि-विलोपन समितीने तीन महिन्यांच्या आत व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाचे प्रमाणपत्र रद्द करण्याबाबत निर्णय घेतला नाही तर, ती बाधित व्यक्ती, तिच्या वर्तमान मान्यता प्रमाणपत्रातील घोषित करण्यात आलेल्या काळातील, उर्वरित काळाकरिता " मान्यताप्राप्त व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक " म्हणून मानली जाईल.

**१०.** व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण पूर्ण झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत, कारखान्याच्या भोगवटादाराला, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण अहवाल आणि त्या कारखान्यातील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य विषयक स्थिती सुधारण्याबाबतच्या त्याच्या शिफारशी पाठवील.

**११.** (एक) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण अहवाल प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, भोगवटादार त्या अहवालामध्ये करण्यात आलेल्या शिफारशी अनुसार केलेल्या कृतीबाबतचा अहवालासह तो अहवाल औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे पाठविल.

(दोन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण अहवालाच्या छाननीनंतर जर, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा नियम ४ अ नुसार समाधानकारकरीत्या करण्यात आलेली नाही, असे आढळून आले तर, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाचे अधिकारी, अशा विसंगतीसंदर्भात व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक व भोगवटादार यांना लेखी कळवतील आणि भोगवटादारास, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या अधिकाऱ्यांनी दाखवून दिलेल्या तफावतींचेच पुन्हा लेखापरीक्षण करण्याचा निदेश देईल. भोगवटादाराला असा निदेश दिल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत असे पुनः लेखापरीक्षण पूर्ण करण्यात येईल.

१२. (एक) एखादी प्रशिक्षण संस्था मान्यतेसाठी प्रशिक्षण संस्था मान्यता समितीकडे नमुना " ड " अर्जानुसार अर्ज करील.

(दोन) प्रशिक्षण संस्था मान्यता समिती, अशा संस्थेचा अर्ज मंजूर झाल्यावर तिला नमुना " ई " मधील मान्यता प्रमाणपत्र देईल.

(तीन) प्रशिक्षण संस्थेकडे आपल्या अर्जाच्या पुष्ट्यर्थ पुढीलप्रमाणे कर्मचारी वर्ग व सोयी-सुविधा अवश्य असाव्यात,

(अ) अनुसूची दोन मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, श्रेणी एकमधील व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकासाठी आवश्यक असलेली अर्हता धारण केलेले कमीत कमी तीन पूर्णवेळ प्राध्यापक असावेत.

(ब) स्वतःच्या मालकीची अथवा भाड्याची, कमीत कमी ३० प्रशिक्षणार्थी बसतील अशी सुसज्ज फर्निचर असलेली जागा असावी.

(क) प्रशिक्षण साधनसामग्रीमध्ये, एलसीडी प्रोजेक्टर व संगणक, पांढरा फलक आणि आवश्यक प्रशिक्षण साधने असावीत.

(चार) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकांकरिता, अभ्यासक्रम व प्रशिक्षणाचा कालावधी हा, प्रशिक्षण संस्था मान्यता समितीने व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाच्या प्रत्येक श्रेणीसाठी वेळोवेळी निश्चित केल्याप्रमाणे असेल.

(पाच) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाच्या कोणत्याही उजळणी प्रशिक्षण वर्गात, प्रशिक्षणार्थींची संख्या ३० पेक्षा अधिक असता कामा नये.

(सहा) प्रशिक्षण संस्था मान्यता समितीने दिलेली मान्यता पाच वर्षांसाठी वैध असेल.

(सात) प्रशिक्षण संस्थेकडे असलेला कर्मचारी वर्ग व सोयी-सुविधा याबाबत पडताळणी करण्याकरिता, त्या संस्थेची तपासणी करण्याचा अधिकार प्रशिक्षण संस्था मान्यता समितीला असेल.

(आठ) जर एखाद्या प्रशिक्षण संस्थेने, सदर नियमात विहित केल्याप्रमाणे आवश्यक कर्मचारी वर्ग व सोयी-सुविधा पुरविणे पुढे चालू ठेवले नाही, तर प्रशिक्षण संस्था मान्यता समितीला सदर संस्थेची मान्यता रद्द करता येईल.

## अनुसूची एक

(नियम ४ पहा)

प्रवर्ग चार मधील कारखान्याचे व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण

**अ.** व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, भारतीय मानक १४४८९:१९९८ मधील विहित पद्धतीचा अवलंब करील.

**ब.** व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, भारतीय मानक १४४८९:१९९८ मधील केवळ पुढील बाबींबाबतच व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करील :—

(अ) अपघाताची माहिती कळविणे, अन्वेषण व पृथक्करण,

(ब) सुरक्षा विषयक निरीक्षण,

(क) सुरक्षा विषयक शिक्षण व प्रशिक्षण,

(ड) प्रथमोपचार,

(ई) सर्वसामान्य कार्यस्थान परिस्थिती,

(फ) धोका निश्चित करणे व त्यास प्रतिबंध करणे (सुरक्षित कार्यचालन पद्धतीसह SOP)

(ग) कार्य परवाना पद्धती,

(ह) वैयक्तिक सुरक्षा साधने (PPE)

(आय) आगीपासून संरक्षण,

(जे) आपत्कालिन व्यवस्थापन,

(के) कारखान्याचे संकल्पचित्र व क्षेत्र वर्गीकरण,

(ल) स्थैतिक विद्युत,

(म) आपत्कालिन सुलभ प्रवेश,

(न) साहित्य हाताळणी,

(ओ) परिवहन.

## अनुसूची दोन

(नियम ५ पहा)

**(अ)** (१) अर्जदार व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, श्रेणी-१ म्हणून मान्यता मिळण्यासाठी पुढील अर्हता व अनुभव इत्यादी धारण करील.

**शैक्षणिक अर्हता व अनुभव :** अर्जदाराने, खालीलपैकी एकतर (अ) किंवा (ब) मधील अर्हता व अनुभव धारण केलेला असला पाहिजे.

(अ) (एक) अभियांत्रिकीच्या एकतर रासायनिक, यांत्रिकी, विद्युत, इलेक्ट्रॉनिक्स किंवा इंस्ट्र्युमेंटेशन या शाखेतील पदवी आणि रासायनिक कारखान्यातील निर्मिती, देखभाल, संकल्पचित्र, प्रकल्प किंवा सुरक्षा विभाग यातील पर्यवेक्षक किंवा त्यावरील पदाचा सात वर्षांचा अनुभव, आणि

(दोन) तंत्रशिक्षण मंडळ किंवा अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठ यांच्याकडून मान्यताप्राप्त असलेली औद्योगिक सुरक्षा यामधील एक वर्षाची पूर्णवेळ पदविका ; किंवा

(ब) अभियांत्रिकीच्या एकतर रासायनिक, यांत्रिकी, विद्युत, इलेक्ट्रॉनिक्स किंवा इंस्ट्र्युमेंटेशन या शाखेतील पदवी आणि औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय किंवा महासंचालक, कारखाना सल्लागार सेवा व कामगार संस्था किंवा राष्ट्रीय सुरक्षा परिषद या संस्थांमध्ये सहाय्यक संचालक किंवा त्यावरील पदाचा सात वर्षांचा अनुभव.

(२) अर्जदार, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, श्रेणी दोन म्हणून मान्यता मिळण्यासाठी पुढील अर्हता व अनुभव इत्यादी धारण करील.

(एक) अभियांत्रिकीच्या एकतर अर्जदार रासायनिक, यांत्रिकी, विद्युत, इलेक्ट्रॉनिक्स किंवा इंस्ट्र्युमेंटेशन या शाखेतील पदवी आणि निर्मिती, देखभाल, संकल्पचित्र, प्रकल्प किंवा सुरक्षा विभाग यातील पर्यवेक्षक किंवा त्यावरील पदाचा पाच वर्षांचा अनुभव ; आणि

(दोन) तंत्रशिक्षण मंडळ किंवा अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठ यांच्याकडून मान्यताप्राप्त असलेली औद्योगिक सुरक्षा यामधील एक वर्षाची पूर्णवेळ पदविका.

(३) अर्जदार, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, श्रेणी तीन म्हणून मान्यता मिळण्यासाठी पुढील अर्हता व अनुभव इत्यादी धारण करील :

(एक) भौतिकशास्त्र आणि/किंवा रसायनशास्त्र विषय घेऊन विज्ञान शाखेची पदवी किंवा यांत्रिकी, विद्युत, इलेक्ट्रॉनिक्स, रासायनिक किंवा इंस्ट्र्युमेंटेशन अभियांत्रिकी यामधील पदविका आणि कोणत्याही उद्योगातील निर्मिती, देखभाल, संकल्पचित्र, प्रकल्प किंवा सुरक्षा यातील पर्यवेक्षक किंवा त्यावरील पदाचा पाच वर्षांचा अनुभव असेल ; आणि

(दोन) तंत्रशिक्षण मंडळ किंवा अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठ यांच्याकडून मान्यताप्राप्त असलेली औद्योगिक सुरक्षा यामधील एक वर्षाची पूर्णवेळ पदविका

(४) अर्जदार, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक, श्रेणी-चार म्हणून मान्यता मिळण्यासाठी पुढील अर्हता व अनुभव धारण करील.

(एक) भौतिकशास्त्र आणि/किंवा रसायनशास्त्र विषय घेऊन विज्ञान शाखेची पदवी किंवा यांत्रिकी विद्युत, इलेक्ट्रॉनिक्स, रासायनिक किंवा इंस्ट्रुमेंटेशन अभियांत्रिकी यामधील पदविका आणि कोणत्याही उद्योगातील निर्मिती, देखभाल, संकल्पचित्र, प्रकल्प किंवा सुरक्षा यामध्ये कारखान्यातील एका किंवा अधिक विभागामध्ये, पर्यवेक्षक किंवा त्यावरील पदाचा पाच वर्षांचा अनुभव ; आणि

**(ब) पूर्वप्रशिक्षण.**— प्रशिक्षण संस्था मान्यता समितीने मान्यता दिलेल्या संस्थेतून, व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा यासंबंधातील पूर्व-प्रशिक्षण अर्जदाराने यशस्वीरित्या पूर्ण केलेले असले पाहिजे.

## नमुना-अ १

[नियम ६ (१) पहा]

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षकाच्या मान्यतेकरिता नूतनीकरणाकरिता व्यक्तीने भरावयाच्या अर्जाचा नमुना

(दोन प्रतीत)

अर्जदाराचे सध्याचे छायाचित्र रेखित स्वाक्षरीसह

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक-श्रेणी-१/श्रेणी २/श्रेणी-३/श्रेणी ४ म्हणून मान्यता मिळण्यासाठी करीता मान्यतेचा अर्ज (नको असलेले खोडावे)

१ नाव ..................................................

२ वडिलांचे/पतीचे नाव : ..................................................

३ जन्मदिनांक व वय : ..................................................

४ कायमचा पत्ता : ..................................................

५ पत्रव्यवहारासाठी पत्ता : ..................................................

..................................................

..................................................

दूरध्वनी क्रमांक : ..................................................

भ्रमणध्वनी क्रमांक : ..................................................

फॅक्स क्रमांक : ..................................................

ई मेल : ..................................................

६ शैक्षणिक अर्हता : (साक्षांकित प्रती जोडाव्यात)

| अनुक्रमांक | पदवी/पदविका | महाविद्यालय/संस्था/विद्यापीठ | पूर्ण झाल्याचे वर्ष |
|---|---|---|---|
| | | | |

७ सुरक्षा यामधील तांत्रिक अर्हता (साक्षांकित प्रती जोडाव्यात) :

| अनुक्रमांक | पदवी/पदविका | महाविद्यालय/संस्था/विद्यापीठ | पूर्ण झाल्याचे वर्ष |
|---|---|---|---|
| | | | |

८ कामाचा अनुभव (साक्षांकित प्रती जोडाव्यात) .

| अनु-क्रमांक | नोकरीचा दिनांक पासून | पर्यंत | नियोक्त्याचे नाव व पत्ता | पदनाम | कामाचे स्वरूप |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

९ मान्यतेच्या नूतनीकरणासाठी

(अ) नोंदणी क्रमांक व दिनांक :

(ब) मान्यता-नि विलोपन समितीने, यांनी यापूर्वी सुरक्षा लेखापरीक्षक म्हणून मान्यता रद्द केली होती किंवा कसे हे नमूद करावे.

रद्द केल्याचा तपशील : (लागू असल्यास)

| रद्द केल्याचा दिनांक | कालावधी पासून | पर्यंत |
|---|---|---|
| | | |

**टीप** : जर यापूर्वी दोन वेळा मान्यता रद्द केली गेली असेल तर, अर्जदार, मान्यतेसाठी पात्र असणार नाही.

(क) मी, मागील दोन वर्षांमध्ये, तीन किंवा तीनपेक्षा अधिक वेळा सुरक्षा लेखापरीक्षा केली आहे. कारखान्याचे नाव, पत्ता व लेखापरीक्षेचा दिनांक दर्शविणारी यादी यासोबत जोडली आहे.

१० कोषागार चलान क्रमांक .............. दिनांक .................... यानुसार प्रक्रिया फीची रक्कम रुपये ......... ....... भरली

**प्रतिज्ञापत्र**

मी, याद्वारे असे घोषित करतो की, या अर्जात देण्यात आलेली सर्व माहिती ही सत्य अणि अचूक आहे.

दिनांक : अर्जदाराची स्वाक्षरी :

ठिकाण : संपूर्ण नाव :

## नमुना-अ २

[नियम ६ (१) पहा]

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून संस्थेच्या मान्यतेकरिता / मान्यतेचे नूतनीकरण करण्याकरिता अर्जाचा नमुना

१ संस्थेचे नाव व पूर्ण पत्ता ..............................

२ संस्थेची स्थिती (शासकीय, स्वायत्त, सहकारी, निगम किंवा खाजगी आहे किंवा कसे ते विनिर्दिष्ट करा) : ..............................

३ (क) संस्थेच्या प्रमुखाचे नाव : ..............................

(ख) दूरध्वनी/भ्रमणध्वनी क्रमांक ..............................

(ग) ई-मेल पत्ता ..............................

(घ) फॅक्स ..............................

४ या राज्याने किंवा अन्य कोणत्याही राज्याने सुरक्षा लेखापरीक्षक म्हणून संस्थेला घोषित केले आहे किंवा कसे ? असल्यास, तपशील द्यावा. : ..............................

५ जोडलेल्या अनुसूचीमध्ये, नोकरीस असलेल्या किमान तीन व्यक्तींची संक्षिप्त माहिती जोडावी. : ..............................

६ अन्य कोणतीही संबंधित माहिती ..............................

७ नोंदणी क्रमांक (नूतनीकरणाच्या बाबतीत). ..............................

८ कोषागार चलान क्रमांक .............. दिनांक .............. यानुसार प्रक्रिया फीची रक्कम रुपये .............. भरली (चलनाची प्रत जोडावी).

९ **प्रतिज्ञापत्र.—**

(अ) मान्यता नि-विलोपन समितीने यापूर्वी सुरक्षा लेखापरीक्षक म्हणून संस्थेची मान्यता मागे घेतली नव्हती किंवा रद्द केली नव्हती.

मान्यता-नि-विलोपन समितीने यापूर्वी सुरक्षा लेखापरीक्षक म्हणून संस्थेची मान्यता मागे घेतली होती किंवा रद्द केली होती त्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :

| मागे घेतल्याचा/रद्द केल्याचा दिनांक | कालावधी पासून | पर्यंत |
| --- | --- | --- |

**टीप** : यापूर्वी दोन वेळा मान्यता रद्द केली गेली असल्यास किंवा मागे घेतली असल्यास संस्था मान्यतेसाठी पात्र असणार नाही.

(ब) संस्थेने मागील दोन वर्षांमध्ये तीन किंवा तीनपेक्षा अधिक वेळा सुरक्षा लेखापरीक्षा केलेल्या कारखान्याचे नाव, पत्ता आणि लेखापरीक्षेचा दिनांक दर्शविणारी यादी या सोबत जोडली आहे.

(क) मी, .................................................. याद्वारे घोषित करतो की, .................................................. द्वारे (संस्थेचे नाव) सादर केलेली वरील माहिती माझ्या माहितीप्रमाणे अचूक असून मी पुढीलप्रमाणे हमी देत आहे की :

(एक) नोकरीस ठेवलेल्या ज्या व्यक्तीच्या आधारे ही मान्यता मिळाली होती त्या व्यक्तीने नोकरी सोडल्यास त्या बाबतीत मान्यता-नि विलोपन समितीला अधिसूचित करीन.

(दोन) व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक याच्या मान्यता प्रमाणपत्रामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या सर्व शर्ती किंवा महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ याखाली केलेले नियम आणि संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचना यांची परिपूर्ती व पालन करीन.

संस्थेच्या प्रमुखाची स्वाक्षरी

पदनाम :

ठिकाण :

दिनांक :

## जोडपत्र नमुना-अ २

(प्रत्येक कर्मचाऱ्याने स्वतंत्रपणे भरावा)

वैयक्तिक माहिती

सही केलेले अलिकडचे छायाचित्र

१ नाव : ..............................................

२ वडिलांचे/पतीचे नाव : ..............................................

३ जन्मतारीख व वय : ..............................................

४ कायमचा पत्ता : ..............................................

..............................................

..............................................

५ पत्रव्यवहाराचा पत्ता : ..............................................

..............................................

..............................................

दूरध्वनी क्रमांक : ..............................................

भ्रमणध्वनी क्रमांक : ..............................................

फॅक्स क्रमांक : ..............................................

ई-मेल : ..............................................

६ शैक्षणिक अर्हता (साक्षांकित प्रती जोडणे) :

| अनुक्रमांक | पदवी/पदविका | महाविद्यालय/संस्था/विद्यापीठ | पूर्ण केल्याचे वर्ष |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

७ सुरक्षेच्या संबंधातील तंत्रविषयक अर्हता (साक्षांकित प्रती जोडणे) :

| अनुक्रमांक | पदवी/पदविका | महाविद्यालय/संस्था/विद्यापीठ | पूर्ण केल्याचे वर्ष |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

८ कामाचा अनुभव (साक्षांकित प्रती जोडणे) :

| अनु-क्रमांक | सेवायोजनाचा दिनांक पासून | पर्यंत | नियोक्त्याचे नाव व पत्ता | पदनाम | कामाचे स्वरूप |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |

**प्रतिज्ञापत्र**

मी, याद्वारे असे घोषित करतो की, या जोडपत्रामध्ये सादर केलेली सर्व माहिती खरी आणि अचूक आहे.

दिनांक : अर्जदाराची स्वाक्षरी :

ठिकाण : नाव :

**नमुना-ब**

[नियम ६ (६) पहा]

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी-एक/श्रेणी दोन/श्रेणी-तीन/श्रेणी-चार करीता मान्यता प्रमाणपत्र

आपल्या अर्जाच्या अनुरोधाने मान्यता नि-विलोपन समितीला, आपण व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी-एक/श्रेणी-दोन/श्रेणी-तीन/श्रेणी-चार म्हणून काम करण्यास पात्र आहात असे आढळून आले आहे आणि म्हणून, महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ याच्या नियम ६(६) द्वारे समितीकडे निहित असलेल्या अधिकारांचा वापर करून, समिती याद्वारे ............................................ (अर्जदाराचे नाव) यांना व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक श्रेणी-एक/श्रेणी-दोन/श्रेणी-तीन/श्रेणी-चार म्हणून, महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ मधील नियम ७ मधील शर्तींच्या अधीनतेने, दोन वर्षांच्या कालावधीकरिता महाराष्ट्र राज्यातील श्रेणी-एक/श्रेणी दोन/श्रेणी-तीन/श्रेणी-चार या प्रवर्गातील कारखान्यांमध्ये व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करण्यास मान्यता देत आहे.

क्रमांक :

दिनांक :

संचालक,
औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,
महाराष्ट्र राज्य, मुंबई व
सदस्य सचिव,
मान्यता-नि विलोपन समिती.

## नमुना-क

[नियम ६ (६) पहा]

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून संस्थेकरिता मान्यता प्रमाणपत्र

आपल्या अर्जाच्या अनुरोधाने मान्यता नि-विलोपन समितीला, आपली संस्था व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षक म्हणून काम करण्यास पात्र आहे असे आढळून आले आहे आणि म्हणून, महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ याच्या नियम ६(६) द्वारे समितीकडे निहित असलेल्या अधिकारांचा वापर करून, समिती याद्वारे ............................................... (संस्थेचे नाव) यांना खालील कर्मचाऱ्यांसह

| अनुक्रमांक | कर्मचाऱ्यांचे नाव | श्रेणी | कारखान्याचा प्रवर्ग |
|---|---|---|---|
| | | | |

महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ मधील नियम ७ मधील शर्तींच्या अधीनतेने, दोन वर्षांच्या कालावधीकरिता महाराष्ट्र राज्यातील कारखान्यामध्ये व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षण करण्यास मान्यता देत आहे.

क्रमांक :

दिनांक :

संचालक,
औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,
महाराष्ट्र राज्य, मुंबई व
सदस्य सचिव,
मान्यता-नि-विलोपन समिती.

## नमुना-ड

[नियम १२ (एक) पहा]

प्रशिक्षण संस्थेस मान्यता मिळण्याकरिता अर्ज

१. प्रशिक्षण संस्थेचे नाव : ...... .... .. ... .. . . ..... ............

२. प्रशिक्षण संस्थेचा पत्ता : . ... ............. . ....... .. .... .... . .

३. संस्थेचे अध्यक्ष/संचालक/मालक यांचे संपूर्ण नाव व राहण्याचा पत्ता (संस्थेच्या नोंदणीच्या संबंधित कागदपत्रांसह) . .......... .......... . . . .. . .

४. दूरध्वनी : ....... . .. ............................. ...

(एक) प्रशिक्षण संस्थेचा दूरध्वनी क्रमांक : .... .............. ............ . . . . ... .

(दोन) प्रशिक्षण संस्थेचा फॅक्स क्रमांक . ............. ............ ............. .....

(तीन) संचालकांचे भ्रमणध्वनी क्रमांक . ................ .... . . . . . .... ........

(चार) ई मेल पत्ता : .. ..... . . . . ...... . . . . . . . .. . . . . .

५. इमारत व वर्ग खोली यांच्या रेखांकन नकाशांसह स्थाननिश्चयन नकाशा अर्जासोबत जोडला आहे हे कृपया नमूद करावे (नकाशे न जोडलेला अर्ज नाकारण्यासाठी पात्र असेल). : . . . .... . . .. ...................

६. कृपया, खालील बाबी उपलब्ध असल्यास ते नमूद करावे : ... .... .. . . ... ... .....

(एक) एलसीडी प्रोजेक्टरची सोय : ..... . ............ .... ...............

(दोन) ध्वनी योजना व जाहीर भाषणाची सुविधा. . ..... ........... ..... .... . ..... . .

(तीन) पांढरा फलक व मार्करची सोय

(चार) प्रशिक्षणार्थीसाठी प्रसाधनगृहाची सोय. . . .. . . . .. .. ..... .... .

(पाच) प्रात्यक्षिक प्रशिक्षण संबंधातील सविस्तर माहिती. . ........ ... . .... .. . . . . .. . .....

(सहा) प्रशिक्षणासाठी चित्रफिती/ प्रात्यक्षिक सुविधा : ........ .. ..................................

(सात) औद्योगिक सुरक्षा व आरोग्या-संबंधी भित्तीपत्रके व साहित्य : .. ........ . .... ............. .........

(आठ) प्रसाधनगृहांचे ब्लॉक्स . .. .. ... . ...... ...... . .. . . .

७. पाठ्यक्रम संरचना/अभ्यासक्रम/अंतर्भूत असलेले विषय याबाबत सविस्तर माहिती (स्वतंत्र माहिती जोडावी). : .. ................. .. . . .... ...........

८. पाठ्यक्रमाचा कालावधी : .......................... ....... ...........

९. प्रशिक्षणार्थीचा स्तर · ...............................................

१०. प्रशिक्षकांची सविस्तर माहिती–

नाव, शैक्षणिक अर्हता, अनुभव, भ्रमणध्वनी क्रमांक.

कृपया संबंधीत कागदपत्रांच्या साक्षांकित प्रती जोडाव्यात : ................................ ...... ......

११. ग्रंथालयाची सोय उपलब्ध आहे किंवा कसे, सविस्तर माहिती द्यावी : ............... ..............................

१२. पाठ्यक्रमाअंती परीक्षा घेतली जाणार आहे किवा कसे : ..............................................

१३. स्पष्टीकरणासाठी प्रकरणाभ्यासाचा पुरेसा संचय उपलब्ध आहे किंवा कसे, सविस्तर माहिती द्यावी. : ........................................ ....

१४. शिक्षणाचे माध्यम कोणते असेल. : ....... ... .... . ... ....... . .... . . ....

१५. अर्जाचे शुल्क, दिनांक व चलान क्रमांक : ............. .... ... . .... ......... . .

अध्यक्ष/संचालकांचे नाव व स्वाक्षरी

ठिकाण :

दिनांक :

## नमुना-ई

[नियम १२ (२) पहा]

व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षेच्या प्रशिक्षण संस्थेचे मान्यता प्रमाणपत्र

आपल्या अर्जास अनुसरून, प्रशिक्षण संस्था मान्यता समितीला, असे आढळून आले आहे की, आपली संस्था व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षेचे प्रशिक्षणपूर्व व उजळणी प्रशिक्षण, म्हणून काम करण्यास पात्र आहे आणि म्हणून, महाराष्ट्र कारखाने (व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षा) नियम, २०११ याच्या नियम १२ (दोन) द्वारे तिच्याकडे निहित केलेल्या अधिकारांचा वापर करून, याद्वारे ................................ (संस्थेचे नाव) यांना महाराष्ट्र राज्यात व्यावसायिक सुरक्षा व आरोग्य लेखापरीक्षेचे प्रशिक्षणपूर्व व उजळणी प्रशिक्षण देण्यासाठी, दोन वर्षांच्या कालावधीकरिता मान्यता देण्यात येत आहे.

क्रमांक :

दिनांक :

संचालक,
औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,
महाराष्ट्र राज्य, मुंबई व
सदस्य सचिव,
प्रशिक्षण संस्था मान्यता समिती.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**डॉ. कविता गुप्ता,**
शासनाचे प्रधान सचिव.

